**दि चिल्ड्रेन्स एड सोसायटी संचलित चेंबूर चिल्ड्रेन्स होम,मानखुर्द येथील संपूर्ण नाल्याभोवती आर.सी.सी. संरक्षण भिंत बांधणेसाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र : माहआ-२०१६/प्र.क.२३८/का ८**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ नोव्हेंबर, २०१६

**संदर्भ:-**

१) राज्य मानवी हक्क आयोग यांचेकडील प्रकरण क्र. CD Case १२१/२०१५ मध्ये दि.१३.६.२०१६ रोजीच्या सुनावणीत दिलेले आदेश
२) अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.अअ/मुंमं/प्रशा-२/५१३४दि.२७.६.२०१६.
३) आयुक्त, महिला व बाल विकास,आयुक्तालय यांचे पत्र मबाविआ/बावि/निधी उप/का-५/२०१६-१७/४५४४ दि. २०.८.२०१६

**प्रस्तावना** :

दि चिल्ड्रेन्स एड सोसायटी, मुंबई संचलित चेंबूर चिल्ड्रेन्स होम,मानखुर्द येथील परिसरात असलेल्या नाल्यास सन २०१५ च्या पावसाळ्यात आलेल्या पुरामुळे चिल्ड्रेन्स होममधील एका प्रवेशित मुलांचा मृत्यू झाला होता. या दुर्दैवी घटनेची सुमोटो दखल राज्य मानवी हक्क आयोगाने घेऊन संदर्भाधीन क्र. १ रोजीच्या सुनावणीत नाल्याभोवती संरक्षण भिंत बांधण्यासाठी अंदाजपत्रक सादर करणेबाबत सार्वजनिक बांधकाम विभागास निर्देश दिले होते. सदर निर्देशास अनुसरून , संदर्भाधीन पत्र क्र. २ अन्वये अधीक्षक अभियंता, सा. बां.मंडळ , मुंबई यांनी रू. १, ७४, ०८,०९२/- (रू. एक कोटी चौ-याहत्तर लक्ष आठ हजार ब्याण्णव फक्त) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक राज्य मानवी हक्क आयोगास सादर केले आहे. संदर्भाधीन पत्र क्र. ३ अन्वये आयुक्त, महिला व बाल विकास यांनी या अंदाजपत्रकास मंजूरी तसेच निधी देणेबाबत शासनास प्रस्ताव सादर केला होता. सबब, शासन दि चिल्ड्रेन्स एड सोसायटी, मुंबई संचलित चेंबूर चिल्ड्रेन्स होम,मानखुर्द येथील संपूर्ण नाल्याभोवती आर.सी.सी. संरक्षण भिंत बांधण्यासाठीच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

वरील प्रस्तावनेत विशद केलेल्या वस्तुस्थितीस अनुलक्षून शासन, दि चिल्ड्रेन्स एड सोसायटी, मुंबई संचलित चेंबूर चिल्ड्रेन्स होम,मानखुर्द येथील संपूर्ण नाल्याभोवती आर.सी.सी. संरक्षण भिंत बांधण्यासाठीच्या कामास रू.१,८३,६४,५८१/- (रुपये एक कोटी त्र्यांऐशी लक्ष चौसष्ट हजार पाचशे ऐक्यांऐशी फक्त) (रू.१, ७४, ०८,०९२ + ६ टक्के इतके सेवाशुल्कांसह) अंदाजपत्रकास महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ खाली प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग-१ उपविभाग ५ च्या वित्तीय अधिकारांतर्गत प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारानुसार या शासननिर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. या कामांवरचा खर्च (२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण,८०० इतर खर्च, ०१ ०५ इमारतीची दुरूस्ती (२२३५-२२४१), २७ लहान बांधकामे मागणी क्र.एक्स-१ योजनेतर अंतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

३. उपरोक्त कामांच्या अनुषंगाने सदर निधी संबंधितांना उपलब्ध करून देण्यासाठी प्रचलित नियमानुसार विहीत कार्यवाही आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांनी करावी. तसेच संरक्षण भिंत बांधकामाच्या प्रगतीबाबत वेळोवेळी आढावा घेण्यात येऊन शासनास अहवाल सादर करावा.

४. सदरची प्रशासकीय मान्यता सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०१६-१७५/इमारत-१/इमारत २ दि.१३.१०.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीच्या अनुषंगानें प्रदान करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१६१११८१७२८३७१६३० असा आहे. सदरचा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Surendra
Pralhad Chankar

Digitally signed by Surendra Pralhad Chankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=da74ced4daa59e5121be348655e71412ea68827bae27cd8d480eb3963ff77726, serialNumber=f0abc250c4d9be2b6b786fa7056a78c0298ba36e78a4582723738fdd3d550d44, cn=Surendra Pralhad Chankar
Date: 2016.11.18 17:32:04 +05'30'

**( सुरेन्द्र प्र.चानकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा.राज्यपाल, यांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई .
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ .मुंबई .
४) मा.सभापती/उपसभापती विधानपरिषद ,महाराष्ट्र विधानमंडळ .मुंबई .
५) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा /विधानपरिषद,महाराष्ट्र विधीमंडळ.
६) मा.मंत्री (म व बा वि)/ राज्यमंत्री(म व बा वि),यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई .
७) अपर मुख्य सचिव, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
८) प्रधान सचिव (व्यय),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
९) आयुक्त , महिला व बाल विकास आयुक्तालय,म.रा. पुणे.
१०) महालेखापाल १, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई
११) महालेखापाल २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
१२) प्रबंधक, राज्य मानवी हक्क आयोग,मुंबई (प्रकरण क्र.१२१/२०१६, दिक्षीत संजीव पुजारी व सचिव म व बा वि च्या अनुषंगाने)
१३) सर्व उपसचिव ,सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास. नवीन प्रशासकीय भवन , मुंबई
१४) उपायुक्त (बालविकास) महिला व बाल विकास आयुक्तालय, म.रा.पुणे.
१५) अधिक्षक अभियंता, (सार्वजनिक बांधकाम) मुंबई मंडळ, २५ मर्झबान रोड फोर्ट, मुंबई-०१
१६) कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सा.बां) विभाग,दा.नौ.रोड, अंधेरी (प.) मुंबई-५८

१७) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-६/अर्थसंकल्प-७) मंत्रालय, मुंबई -३२

१८) कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-१/इमारत-२) मंत्रालय, मुंबई -३२,

१९) मुख्य अधिकारी, दि चिल्ड्रेन्स एड सोसायटी,माहिम,मुंबई

२०) जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी मुंबई शहर/मुंबई उपनगर

२१) सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन , मुंबई

२२) निवड नस्ती का-८.